**वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीच्या मंजूरीचे**
**वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वैखप्र २०१९/प्र.क्र.१८१/२०१९/सेवा-४**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : १३/१२/२०१९**

वाचा : १) सार्वजनिक आरोग्य विभाग, शा.नि.क्र. वैखप्र २०१६/प्र.क्र.१६/२०१६/राकावि-२, दिनांक १६ मार्च, २०१६.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शा.नि.क्र. वैखप्र २०१८/प्र.क्र.४८८/२०१८/राकावि-२, दिनांक ०६ जून, २०१९.

**प्रस्तावना :-**

शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ मधील तरतूदींच्या अधीन राहून, आकस्मिकरीत्या उद्भवणाऱ्या २७ आजारांवर खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील तसेच ५ गंभीर आजारांवर, शासनाने संपूर्ण खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी मान्यता दिलेल्या खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारावरील वैद्यकीय खर्चाच्या प्रत्येक प्रकरणी रु. ३,००,०००/- (रुपये तीन लक्ष फक्त) च्या कमाल मर्यादेत प्रतिपूर्तीस मंजूरी देण्याचे अधिकार उपरोक्त वाचा येथील अ.क्र.१ येथील सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय, दिनांक १६ मार्च, २०१६ नुसार विभाग प्रमुखांना प्रदान केलेले आहेत. या मर्यादेवरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीचे अधिकार प्रशासकीय विभाग प्रमुखांना असल्याने संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडे प्रस्ताव सादर केले जातात. वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीच्या प्रस्तावांची प्रलंबित प्रकरणे लक्षात घेता, महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील अटी व शर्तींच्या अधीन राहून रु. ३,००,०००/- ( अक्षरी रुपये तीन लक्ष फक्त) पर्यंतच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्ती संदर्भात विभागप्रमुखांना असलेल्या वित्तीय अधिकारात सार्वजनिक आरोग्य विभागाच्या उपरोक्त वाचा अ.क्र. २ येथील शासन निर्णय दिनांक ०६ जून, २०१९ नुसार बदल करण्यात आले आहेत. या शासन निर्णयाच्या परिच्छेद ६ मध्ये नमूद केल्यानुसार सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सध्याच्या आकृतिबंधातील मंजूर पदनामे विचारात घेवून, निव्वळ वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या मंजूरीकरीता विभागाच्या अधिनस्त सर्व क्षेत्रीय कार्यालयांमध्ये विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख घोषित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या शासन निर्णय, दि. ०६ जून, २०१९ च्या परिच्छेद ६ मध्ये नमूद केल्यानुसार सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत क्षेत्रीय कार्यालयांमध्ये अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या निव्वळ वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या मंजूरीकरीता विभागप्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख पुढील प्रमाणे घोषित करण्यास व त्यांच्यासमोर विहित केलेल्या वित्तीय मर्यादेत प्रतिपूर्तीचे अधिकार प्रदान करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | सक्षम प्राधिकारी | सक्षम प्राधिकारी यांचे पदनाम | शा.नि.सा.आ.वि. दि.०६/०६/२०१९ नुसार अधिकार |
|---|---|---|---|
| १. | मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई | रु.३,००,०००/- (अक्षरी रुपये तीन लक्ष) वरील प्रकरणे |
| २. | विभाग प्रमुख | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती | रु. २,००,०००/- (अक्षरी रु. दोन लक्ष) वरील परंतु रु. ३,००,०००/- (अक्षरी रुपये तीन लक्ष) पर्यन्तची प्रकरणे |
| | | मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई | |
| | | मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई | |
| | | मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई | |
| | | अधिक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई | |
| | | संचालक, उपवने व उद्याने, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई | |
| ३. | प्रादेशिक विभाग प्रमुख | सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे | रु.२,००,०००/- (अक्षरी रु. दोन लक्ष) पर्यन्तची सर्व प्रकरणे |
| | | अधिक्षक अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग | |
| | | अधिक्षक अभियंता (रा.म.), सार्वजनिक बांधकाम विभाग | |
| | | कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग | |
| | | उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, | |
| | | सहाय्यक संचालक, उपवने व उद्याने, सार्वजनिक बांधकाम विभाग | |

२. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ सर्व क्षेत्रीय कार्यालयांमधील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीस मंजूरी देताना सार्वजनिक आरोग्य विभागाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या अटी व शर्ती यांची पूर्तता होत असल्याची खातरजमा करावी तसेच दिनांक ०६ जून, २०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदींचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९१२१३१३१५०२२६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

N B Khedkar

Digitally signed by N B Khedkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=99977b58556463dbb2db463cec9482d13f7661ed3b2a95e83e386485fff4c21e, cn=N B Khedkar
Date: 2019.12.13 13:17:56 +05'30'

(नि. भा. खेडकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. मंत्री (सा.बां.)(सा.उ.) यांचे खाजगी सचिव,
४) मंत्री (सा.बां.)(सा.उ. वगळून) यांचे खाजगी सचिव,
५) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा,
६) मा. विधान परिषद/विधानसभा सदस्य,
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
८) अपर मुख्य सचिवांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/पुणे/कोकण/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
१२) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
१३) मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
१४) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
१५) अधिक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनि बांधकाम विभाग, मुंबई,
१६) सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे,
१७) अधिक्षक अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग,
१८) अधिक्षक अभियंता (रा.म.), सार्वजनिक बांधकाम विभाग,
१९) संचालक, उपवने व उद्याने, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
२०) कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग,
२१) उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२२) सहाय्यक संचालक, उपवने व उद्याने, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
२३) कार्यासन (सेवा-४) संग्रहार्थ.